लोहमार्ग पोलीस दूरक्षेत्र शेगावचे रुपांतर लोहमार्ग
पोलीस ठाण्यात करणे व लोहमार्ग पोलीस ठाणे
जलंबचे रुपांतर लोहमार्ग पोलीस दूरक्षेत्रात करणेबाबत

महाराष्ट्र शासन
गृह विभाग,
शासन निर्णय क्रमांक पीओपी २६१०/५९६/प्र क्र ४५२/पोल-३
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ९ ऑगस्ट, २०११

वाचा :- १) शासन निर्णय गृह विभाग, क्र. एमआयएस ०२११/प्र क्र २३/पोल-३ दिनांक ०४.०५.२०११
२) पोलीस महासंचालक, यांचे पत्र क्र. पोमसं २६-अ/४७/शेगाव पो.ठाणे (रेल्वे नागपूर) १३९/०८ दिनांक १९.०५.२०११
३) कृते मंडळ सुरक्षा आयुक्त, आरपीएफ, भुसावळ, यांचे पत्र क्रमांक प.सं. भुसा/सीआर 29/MISC/2011 दिनांक ०३.०१.२०११
४) अपर पोलीस महासंचालक , लोहमार्ग यांचे पत्र क्र. पोअलोना/प्रली पशा/ ८३४४/२००९ नागपूर दिनांक ०७/१२/२००९

**प्रस्तावना :-** शेगाव हे धार्मिक ठिकाण असून त्याठिकाणी गजानन महाराज यांची समाधी आहे. सदर समाधीच्या दर्शनाकरिता महाराष्ट्रातून आणि इतर प्रांतातून दररोज रात्रंदिवस हजारोच्या संख्येने भाविक / प्रवासी येत असतात. त्याचप्रमाणे शेगाव रेल्वे स्टेशन अत्यंत महत्वाचे स्टेशन असून, मध्य रेल्वेच्या सर्व महत्वाच्या अप-डाऊन गाडया या स्टेशनवर थांबतात. त्यामुळे तेथे प्रवाशांच्या गर्दीवर नियंत्रण ठेवणे, प्रवाशांच्या सामानाचे चोरांपासून संरक्षण करणे, महिला प्रवाशांना विशेष संरक्षण देणे, गुन्हयांवर नियंत्रण ठेवणे इ. करिता कायदा व सुव्यवस्था राखण्यासाठी शेगाव येथे लोहमार्ग पोलीस ठाण्याची अत्यंत आवश्यकता आहे. शेगांव लोहमार्ग दूरक्षेत्राचे लोहमार्ग पोलीस ठाण्यात रुपांतर केल्यास शेगाव रेल्वेस्थानकावर पुरेसा बंदोबस्त ठेवणे, गुन्हयावर नियंत्रण ठेवणे, कायदा व सुव्यवस्था राखणे शक्य होईल म्हणून लोहमार्ग पोलीस दूरक्षेत्र शेगावचे रुपांतर लोहमार्ग पोलीस ठाण्यात करणे व लोहमार्ग पोलीस ठाणे जलंबचे रुपांतर लोहमार्ग पोलीस दूरक्षेत्रात करणेबाबत पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी वरील पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे.

**शासन निर्णय :-** पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचा प्रस्ताव विचारात घेऊन शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतले आहे.

अ) लोहमार्ग पोलीस दूरक्षेत्र शेगावचे लोहमार्ग पोलीस ठाणे करण्यात यावे.

ब) लोहमार्ग पोलीस ठाणे जलंबचे लोहमार्ग पोलीस दूरक्षेत्र करण्यात यावे.

क) सध्याचे लोहमार्ग पोलीस ठाणे जलंब करीता कार्यरत असलेली पदे नियोजित लोहमार्ग पोलीस ठाणे शेगाव करीता वर्ग करण्यात यावी व लोहमार्ग पोलीस दूरक्षेत्र शेगाव करीता कार्यरत असलेली पदे पोलीस दूरक्षेत्र जलंब करीता वर्ग करण्यात यावी.

२.     वरील शासन निर्णयामुळे नवनिर्मित लोहमार्ग पोलीस ठाणे शेगाव व पोलीस दूरक्षेत्र जलंब यांचे संख्याबळ पुढीलप्रमाणे राहील :-

**लोहमार्ग पोलीस ठाणे शेगाव**

| अ.क्र. | पद | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | सहायक पोलीस निरीक्षक | १ |
| २ | पोलीस उपनिरीक्षक | १ |
| ३ | सहायक पोलीस उप निरीक्षक | ४ |
| ४ | पोलीस हवालदार | ९ |
| ५ | पोलीस नाईक /शिपाई | २४ |
| ६ | सहायक पोलीस उपनिरीक्षक (बिनतारी ) | १ |
| ७ | पोलीस हवालदार (बिनतारी) | ३ |
| | एकूण | ४३ |

**लोहमार्ग पोलीस दूरक्षेत्र जलंब**

| अ.क्र. | पद | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | सहायक पोलीस उप निरीक्षक | २ |
| २ | पोलीस हवालदार | १ |
| ३ | पोलीस शिपाई / नाईक | २ |
| | एकूण | ५ |

३.     यासाठी येणारा खर्च मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस, १११ रेल्वे पोलीस (००)(०३) रेल्वे पोलीस (२०५५ ०४४४) या लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४.     सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात येत असून, त्याचा संगणक सांकेताक २०११०८०८१८०३१८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्र. मो. वानखडे )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई
अपर पोलीस महासंचालक, लोहमार्ग, मुंबई
कृते मंडळ सुरक्षा आयुक्त, आरपीएफ, भुसावळ,
महालेखापाल लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता महाराष्ट्र १/२ , मुंबई / नागपूर
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी नागपूर / बुलढाणा
पोलीस अधीक्षक, लोहमार्ग नागपूर
अवर सचिव (बीयूडी-१) गृह विभाग,
कक्ष अधिकारी (पोल-४/ पोल-५अ/ब ), गृह विभाग
निवड नस्ती पोल-३